अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण
घेणा-या मुलींसाठी विद्यापीठात वसतीगृहे
सुरु करण्याबाबत योजना.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० डिसेंबर, २०११.

वाचा : शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२००९/प्र.क्र.१५/
का.८, दि.०२.०३.२०१०.

<u>प्रस्तावना</u> :-

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये वसतीगृहे सुरू करण्याबाबतचा शासन निर्णय दि. ०२.०३.२०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर विद्यापीठांमार्फत अल्पसंख्याक मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासंदर्भात सदर शासन निर्णयातील काही अटींमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतीगृह बांधण्यासंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

१. अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहासाठी विद्यापीठ जमिन देवून स्वत: बांधकाम करणार असल्यास वसतीगृहाचे बांधकाम विद्यापीठामार्फत त्यांच्या आराखडयानुसार करता येईल. त्यासाठी आराखडा व अंदाजपत्रक शासनाकडून मान्य करून घेणे बंधनकारक राहील. अन्यथा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तयार केलेल्या नकाशा व अंदाजपत्रकानुसार सार्वजनिक बांधकाम विभागाकडून बांधकाम करता येईल.

२. वसतीगृहाच्या जमिनीवर विद्यापीठाची मालकी राहील तसेच जमिनीबाबतचे हक्क व अधिकार विद्यापीठाकडे रहातील.

३. अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहाच्या इमारतीचा उपयोग अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही बाबींसाठी करता येणार नाही, या अटीच्या अधिन राहून अल्पसंख्याक विकास विभागाकडून उपलब्ध करून दिलेल्या निधीमधून बांधलेल्या वसतीगृहाच्या इमारतीबाबतचे सर्व हक्क व अधिकार विद्यापीठाकडे रहातील.

४. सदर वसतीगृहासाठी आवश्यक फर्निचरकरीता अल्पसंख्याक विकास विभागाकडून निधी उपलब्ध करून देण्यात येईल. मात्र वसतीगृहाच्या इमारतीची देखभाल व दुरुस्ती तसेच वसतीगृह चालविण्यासाठी येणाऱ्या खर्चासाठी विद्यापीठास निधी उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

५. वसतीगृह विद्यापीठामार्फतच चालविण्यात येईल.

६. या वसतीगृहात १०० मुलींच्या निवासाची सोय करण्यात येईल. यापैकी ७०% जागा अल्पसंख्याक समाजातील मुलींसाठी राखीव असतील तर उर्वरित ३०% जागा बिगर अल्पसंख्याक समाजातील मुलींमधून शासनाच्या प्रचलित आरक्षणानुसार भरण्यात येतील.

७० जागांपैकी मुस्लिम मुलींसाठी ३५, बौध्द मुलींसाठी २१, ख्रिश्चन मुलींसाठी ६, जैन मुलींसाठी ६, शीख व पारसी मुलींसाठी प्रत्येकी १ जागा राखीव असेल. तसेच एका प्रवर्गातील मुली उपलब्ध न झाल्यास अन्य प्रवर्गातील मुलींना रिक्त जागी प्रवेश देण्यात येईल. सदर वसतीगृहात पदवी व पदव्युत्तर शिक्षण घेणा-या अल्पसंख्याक समुदायातील मुलींनाच प्रवेश देण्यात येईल व जर काही जागा शिल्लक राहिल्यास त्या जागा विद्यापीठामार्फतच इतर विदयार्थीनीना प्रवेश देवून भरता येतील.

७. अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी विद्यापीठ किंवा सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तयार केलेल्या अंदाजपत्रकानुसार आवश्यक निधी अल्पसंख्याक विकास विभागाकडून संबधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत उपलब्ध करून दिला जाईल.

८. वसतीगृह चालविण्यासाठी येणारा दैनंदिन खर्च व इमारतीच्या देखभालीवरील खर्च वसतीगृहात प्रवेश घेणाऱ्या मुलींकडून निवास व भोजन व्यवस्थेसाठी वाजवी दराने फी/भाडे आकारणी करून भागविण्यात यावा. आकारण्यात येणारे भाडे / फी चे दर विद्यापीठामार्फत चालविण्यात येणा-या इतर वसतीगृहातील विद्यार्थ्यांसाठी आकारण्यात येणा-या फी पेक्षा जास्त असू नये.

९. अल्पसंख्याक मुलींच्या वसतीगृहाचे निरीक्षण करण्याचे अधिकार अल्पसंख्याक विभागाचे अधिकारी किंवा प्रतिनिधी यांना राहील.

१०. वसतीगृहाच्या इमारतीचा उपयोग अल्पसंख्याक समाजातील शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या निवासाव्यतिरिक्त अन्य कारणांसाठी होत असल्याचे निदर्शनास आल्यास त्यासंदर्भात योग्य ती कार्यवाही करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, (०१)(०८) शहरातील अल्पसंख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहाकरिता सहाय्यक अनुदान (२२३५ ए १४२) ३१ सहाय्यक अनुदान" या लेखाशीर्षातंर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.mdd.maharashtra.gov.in)उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०१११२२००९४६२३१२२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( एस. एस. काद्री )
शासनाचे सहसचिव

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
राज्यातील सर्व विद्यापीठे
संचालक, लेखा व कोषागारे
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
सर्व मंत्रालयीन विभाग
उपसचिव, वित्त विभाग व्यय-४,मंत्रालय, मुंबई
उपसचिव,नियोजन विभाग १४७५,मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती.

*D:\Maulana\2011\GR.2011.lwp*